सहायक कामगार आयुक्त, गट-अ (वेतन मॅट्रीक्स स्तर एस-१८, रु. ४९१००-१५५८००) या पदावर तात्पुरती पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, उर्जा व कामगार विभाग
## शासन आदेश क्रमांकः पदोन्न-२०२१/प्र.क्र.११७/कामगार-८

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: २२ सप्टेंबर, २०२१

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग, अधिसुचना क्रमांकः एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या.-१२, दि.१४.०७.२०२१
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांकः क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: दिव्यांग-२०१५/प्र.क्र.१७१/१६-अ, दि.०५.०७.२०२१
४) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०१९/प्र.क्र.१९०/ कामगार-८, दि.०६.०७.२०२१
५) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक: दिव्यांग-२०१५/प्र.क्र.१७१/१६-अ, दि.२३.०७.२०२१
६) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन आदेश क्रमांक: पदोन्न २०२१/प्र.क्र.११७/ कामगार-८, दि.३०.०८.२०२१

**प्रस्तावना :**

कामगार आयुक्त यांच्या आस्थापनेवरील सरकारी कामगार अधिकारी, गट-ब संवर्गातील एकुण ११ अधिका-यांना सन २०२०-२१ या निवडसुची वर्षाकरिता उपरोक्त अ.क्र. ६ येथील शासन आदेशानुसार, सहायक कामगार आयुक्त, गट-अ या पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे. सदर आदेशातील नमूद श्री.रा.प्र.तोडकर आणि श्रीमती निशा नगरारे यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेसंदर्भात स्वतंत्ररित्या आदेश निर्गमित करण्याचे सदर आदेशात नमूद करण्यात आले होते. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या अभिप्रायानुसार, सदर आदेशातील नमूद श्रीमती जा.मा.भोईटे यांना वाटप करण्यात आलेल्या महसुली विभागामध्ये आणि त्यानुसार त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेमध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे. यास्तव, सदर आदेशातील एकुण ११ अधिका-यांपैकी ०३ अधिका-यांना सहायक कामगार आयुक्त,गट-अ संवर्गातील पदोन्नतीनंतरची पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:**

कामगार आयुक्त यांच्या आस्थापनेवरील सरकारी कामगार अधिकारी, गट-ब संवर्गातील एकुण ११ अधिका-यांना सहायक कामगार आयुक्त, गट-अ (वेतन मॅट्रिक्स स्तर एस-१८, रु.४९१००-१५५८००) या संवर्गात उपरोक्त अ.क्र.६ येथील नमूद दि.३०.०८.२०२१ रोजीच्या शासन आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात आलेली आहे. त्यापैकी एका अधिका-याची पदोन्नतीनंतरची पदस्थापना सुधारित करण्यात येत असून पदस्थापनेसाठी उर्वरित दोन अधिका-यांना खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्यांचे नाव | पदस्थापनेचा महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | श्रीमती जा. मा. भोईटे | नागपूर | सहायक कामगार आयुक्त, चंद्रपूर या रिक्त पदावर |
| २ | ७ | श्री. रा.प्र.तोडकर | अमरावती | सहायक कामगार आयुक्त, अमरावती या श्री. अनिल कुटे यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदावर |
| ३ | ९ | श्रीमती निशा नगरारे | नागपूर | अपर कामगार आयुक्त, नागपूर यांच्या कार्यालयातील सहायक कामगार आयुक्त, नागपूर या रिक्त पदावर |

३. वरील अधिका-यांच्या संदर्भात उपरोक्त अ.क्र.६ येथील नमूद शासन आदेशातील परिच्छेद क्र.३ येथील अटी व शर्ती कायम राहतील.

४. उपरोक्त तक्त्यात नमूद अधिका-यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी याद्वारे तात्काळ कार्यमुक्त करण्यात येत असून त्यांनी नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू व्हावे. याबाबतचा रुजू अहवाल संबंधित पदोन्नत अधिका-यांनी कामगार आयुक्त यांच्यामार्फत शासनास सादर करावा. तसेच त्यांनी अनधिकृतपणे रजेवर जाऊ नये. तसेच पदस्थापना रद्द अथवा त्यात बदल करणेसाठी कोणत्याही स्वरुपाचे आवेदन सादर करु नये. तसे केल्यास सदर अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात पात्र ठरतील, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली,२०२१ मधील २ (ड) आणि उपरोक्त अ.क्र.१ येथील नमूद अधिसुचनेतील नियम १३ मधील तरतुदीनुसार पदोन्नतीने नियुक्ती होणा-या सदर अधिका-यांनी सदर आदेश निघाल्याच्या तारखेपासून ३० दिवसांच्या विहित मुदतीमध्ये रुजु होणे आवश्यक आहे. सदर मुदतीत रुजु न झाल्यास संबंधित अधिका-याचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन ( dias non) म्हणुन गणला जाईल, याची देखील संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२२१२५८३०५४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR

Digitally signed by DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=feb24b5f5d1512bb47f7bae5ad1db4953358cd43c999bdf0814c6bb78364d50a, cn=DR. SHRIKANT LAXAMANRAO PULKUNDWAR
Date: 2021.09.22 12:59:49 +05'30'

**( डॉ. श्री. ल. पुलकुंडवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४. कामगार आयुक्त, कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
५. कामगार उप आयुक्त (प्रशासन), कामगार भवन, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई
६. महालेखापाल कार्यालय (ले. व अ.)/(ले.प.), मुंबई-१/नागपूर-२
७. अपर कामगार आयुक्त, कोकण/नागपूर/पुणे
८. कामगार उप आयुक्त,मुंबई/ठाणे/रायगड/पालघर/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती
९. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
१०.संबंधित अधिकारी (कामगार आयुक्त यांचेमार्फत)
११.निवड नस्ती.